पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण व अतिरिक्त जिल्हा न्यायाधिश, अचलपूर, जिल्हा- अमरावती यांना कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : एमसीटी-०५०२/ ६६७ / सीआर- ८६ /परि-५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दिनांक : ७ मे, २००२.

वाचा :- १) शासन अधिसूचना, गृह विभाग, क्र.एमसीटी ०४९८ /(२३-ब) / परि-५, दि. ११.०८.२०००.
२) जिल्हा व सत्र न्यायाधिश, अमरावती यांचे पत्र क्र. C.&F./४९३/२००२,दि.१९.०१.२००२.
३) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) यांचे पत्र क्र. अे. १२२४/८०, दि. ४.०२.२००२.

**शासन निर्णय** :- मोटार वाहन कायदा, १९८८ ( १९८८ चा ५९ ) च्या कलम १६५(२)च्या अधिकारानुसार शासन अधिसूचना, गृह विभाग, क्रमांक : एमसीटी ०४९८ /(२३-ब) / परि-५, दिनांक ११.०८.२००० अन्वये अचलपूर, जिल्हा- अमरावती येथे मोटार अपघाताचे दावे चालविण्यासाठी एक सदस्यीय मोटार अपघात दावा न्यायाधिकरण स्थापण्यात आले आहे व अतिरिक्त जिल्हा न्यायाधिश, अचलपूर, जिल्हा- अमरावती यांची या न्यायाधिकरणावर पदसिध्द सदस्य म्हणून नेमणुक केली आहे. आता या आदेशान्वये पदसिध्द सदस्य मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, अचलपूर, जिल्हा- अमरावती यांना या न्यायाधिकरणाचे कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/ विनियम दिनांक ११.७.२००१ मधील अ.क्र. ३ वरील नियम कमांक २ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

विजय बागवे
**( विजय बागवे )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपील शाखा ), मुंबई (पत्रान्वये )
जिल्हा व सत्र न्यायाधिश,व पदसिध्द सदस्य मोटारअपघात दावा न्यायाधिकरण, अमरावती.
अतिरिक्त जिल्हा न्यायाधिश व पदसिध्द सदस्य , मोटार अपघात दावा न्यायाधिकरण,अचलपूर, जिल्हा- अमरावती.
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र - २,नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
विधी व न्याय विभाग, कार्यासन १२/ कार्यासन ३.
वित्त विभाग ( विनियम / व्यय -८).
गृह विभाग, आस्था-४ ( सर्वांचे माहितीसाठी ).
निवड नस्ती, परिवहन -५.

GR-200207191233210001-0200